एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम
वित्तिय वर्ष २०२०-२१ करीता वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेस एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली अनुदान वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१९/प्र.क्र.१५/सीपीटीपी-ब
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०५ नोव्हेंबर, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ/१८-ब, दिनांक ०८ ऑगस्ट, २०१४.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनाक १२ जुलै, २०१९.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनाक १६ नोव्हेंबर, २०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनाक ०९ मार्च, २०२०.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.०४.२०२०
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२०
७) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर, यांचे पत्र क्रमांक वनामती/सीपीटीपी/सुधारित अनुदान/२०१९-२०/१९४४/२०२०, दिनांक २१.१०.२०२०

प्रस्तावना :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २०.०१.२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत असून प्रशिक्षणासाठी प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी उपलब्ध करुन द्यावयाचा निधी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक ०८.०८.२०१४ अन्वये निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम ३ व ४ या तुकड्यांचे उर्वरित प्रशिक्षण व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम ४ अ, ५ व ६ या तुकडीचे नियमित प्रशिक्षण तसेच एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम २,३ व ४ चे प्रशिक्षण अपूर्ण राहिलेले प्रशिक्षणार्थी यांच्या प्रशिक्षणासाठी सन २०१९-२० या अर्थसंकल्पिय वर्षात प्रत्यक्ष झालेल्या एकूण रुपये ६,०६,७४,०००/- ( अक्षरी रुपये सहा कोटी सहा लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त ) खर्चापैकी ८० टक्क्याच्या मर्यादेत रु.५,५४,४०,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला होता. आता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालीउपलब्ध असलेल्या तरतुदीतून उर्वरित निधी रूपये ५२,३४,०००/ ( अक्षरी रूपये बावन्न लाख चौतीस हजार फक्त) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर, प्रशिक्षण संस्थेस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय : -

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत सीपीटीपी ३ व ४ या तुकड्यांचे उर्वरित प्रशिक्षण व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम ४ अ, ५ व ६ या तुकडीचे नियमित प्रशिक्षण तसेच एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम २,३ व ४ चे प्रशिक्षण अपूर्ण राहिलेले प्रशिक्षणार्थी यांच्या प्रशिक्षणासाठी सन २०१९-२० या अर्थसंकल्पिय वर्षात पुढील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार प्रत्यक्ष झालेल्या एकूण

रुपये ६,०६,७४,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी सहा लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

| वनामती सन २०१९-२० मधील प्रशिक्षणावरील खर्च | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **प्रशिक्षणाचे टप्पे** | **कालावधी** | **सीपीटीपी-५ व सीपीटीपी-६ च्या प्रशिक्षणामधील उमेदवार** | **प्रतिदिन खर्च** | **एकूण रुपये (रुपये हजारात)** | **एकूण रुपये (रुपये हजारात)** |
| १ | पुनर्विलोकन व उजळणी प्रशिक्षण - सीपीटीपी ३ व ४ १७.०६.२०१९ ते ३०.०६.२०१९ | १४ दिवस | ३३ | ३५००/- | | **१६,१७,०००** |
| २ | कागदपत्र पडताळणी दि.३०.०९.२०१९ ते ०३.१०.२०१९ | ४ दिवस | ११५ (सीपीटीपी-५) | ३५००/- | **१६,१०,०००** | |
| | दि.०२.१०.२०१९ ते ०३.१०.२०१९ | २ दिवस | ५९ (सीपीटीपी-६) | ३५००/- | **४,१३,०००** | |
| | | | | | **एकुण** | **२०,२३,०००** |
| ३ | पायाभूत प्रशिक्षण (सीपीटीपी ४ अ, ५ व ६ ) दि.०४.१०.२०१९ ते ३०.११.२०१९ | ८ आठवडे (५६ दिवस) | ११५+५९+२० = १९४ उमेदवार | ३५००/- | | **३,८०,२४,०००** |
| ४ | **अनिवार्य संलग्नता** (सीपीटीपी ४ अ, ५ व ६ ) | | | | | |
| | गाव संलग्नता दि.९.१२.२०१९ ते १३.१२.२०१९ दि.१६.१२.२०१९ ते २०.१२.२०१९ | ७ दिवस | १९१ | रु.२०००/- | **२६,७४,०००** | |
| | आदिवासी संलग्नता दि.९.१२.२०१९ ते १३.१२.२०१९ दि.१६.१२.२०१९ ते २०.१२.२०१९ | ७ दिवस | १९१ | रु.२०००/- | **२६,७४,०००** | |
| | सैन्यदल संलग्नता दि.२.१२.२०१९ ते ०६.१२.२०१९ | ५ दिवस | १९१ | रु.२०००/- | **१९,१०,०००** | |
| | एम.आर.ए.संलग्नता दि.२२.१२.२०१९ ते २४.१२.२०१९ | ३ दिवस | १९१ | रु.२०००/- | **११,४६,०००** | |
| | एन.डी.आर.एफ.संलग्नता दि.२६.१२.२०१९ ते २८.१२.२०१९ | ३ दिवस | १९० | रु.२०००/- | **११,४०,०००** | |
| | न्यायिक संलग्नता दि.२४.०२.२०२० ते २६.०२.२०२० | ३ दिवस | १९१ | रु.२०००/- | **११,४६,०००** | |
| | विधानमंडळ संलग्नता दि.२७.०२.२०२० ते २९.०२.२०२० | ३ दिवस | १९२ | | **११,५२,०००** | |
| | | | | | **एकुण** | **१,१८,४२,०००** |
| ५ | **अनिवार्य संलग्नता जुने प्रशिक्षणार्थी** (सीपीटीपी २,३ ४) | | | | | |
| | गाव संलग्नता दि.९.१२.२०१९ ते १३.१२.२०१९ दि.१६.१२.२०१९ ते २०.१२.२०१९ | ७ दिवस | ३ | रु.२०००/- | **४२,०००** | |
| | आदिवासी संलग्नता दि.९.१२.२०१९ ते १३.१२.२०१९ दि.१६.१२.२०१९ ते २०.१२.२०१९ | ७ दिवस | १४ | रु.२,०००/- | **१,९६,०००** | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | सैन्यदल संलग्नता<br>दि.२.१२.२०१९ ते ०६.१२.२०१९ | ५ दिवस | १५ | रु.२,०००/- | **१,५०,०००** | |
| | एम.आर.ए.संलग्नता<br>दि.२२.१२.२०१९ ते २४.१२.२०१९ | ३ दिवस | ४ | रु.२,०००/- | **२४,०००** | |
| | एन.डी.आर.एफ.संलग्नता<br>दि.२६.१२.२०१९ ते २८.१२.२०१९ | ३ दिवस | २ | रु.२,०००/- | **१२,०००** | |
| | न्यायिक संलग्नता<br>दि. २४.०२.२०२० ते २६.०२.२०२० | ३ दिवस | १ | रू.२,०००/- | **६,०००** | |
| | विधानमंडळ संलग्नता<br>दि.२७.०२.२०२० ते २९.०२.२०२० | ३ दिवस | ३ | रू.२,०००/- | **१८,०००** | |
| | | | | | **एकुण** | **४,४८,०००** |
| ६ | दिल्ली दर्शन संसद सलग्नता<br>दि.२३.१२.२०१९ ते २९.१२.२०१९ | ७ दिवस | ८९ नवीन प्रशिक्षणार्थी | रु.५०००/- | | **३१,१५,०००** |
| | | | १३ जुने प्रशिक्षणार्थी | रु.५०००/- | | **४,५५,०००** |
| ७ | महाराष्ट्र दर्शन<br>(दि.३०.१२.२०१९ ते ०५.०१.२०२०) | ७ दिवस | ७५ नवीन प्रशिक्षणार्थी | ५०००/- | | **२६,२५,०००** |
| | | | जुने प्रशिक्षणार्थी १५ | ५०००/- | | **५,२५,०००** |
| | एकूण | | | | **एकुण** | **६,०६,७४,०००** |

२. उपरोक्तनुसार प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या एकूण रुपये एकूण रुपये ६,०६,७४,०००/- एवढया खर्चापैकी रुपये ५,५४,४०,०००/- इतका निधी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १२.०७.२०१९, दिनांक १६.११.२०१९ व दिनांक ०९.०३.२०१९ अन्वये सन २०१९-२० या अर्थसंकल्पिय वर्षात वनामती प्रशिक्षण संस्थेस वितरित करण्यात आला. आता सदर शासन निर्णयान्वये उर्वरित रूपये ५२,३४,०००/ ( अक्षरी रूपये बावन्न लाख चौतीस हजार फक्त) इतका निधी लेखाशिर्ष ए-४, २०७०-इतर प्रशासनिक सेवा, ००३-प्रशिक्षण, ००३(००)(११), वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२०७०००८६२) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात वितरित करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) संचालक वनामती, नागपूर या संस्थेने खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम कोषागारातून आहरीत करण्याची दक्षता घ्यावी.

आ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरीत केल्यानंतर आहरीत केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीषार्खाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करून घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसाच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ), महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

उ) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके

तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर यांना राहतील व त्याकरीता वनामती त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

ऊ) वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० व दिनांक ०४.०५.२०२० च्या शासन निर्णयातील नमूद अटी शर्तीचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर,या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम रु.५२,३४,०००/- ( अक्षरी रूपये बावन्न लाख चौतीस हजार फक्त ) आहरित करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२६/२०२०/व्यय-४, दिनांक २७.१०.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०५१६३५०१९३०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNILSING SHIVAJI NIKAM

Digitally signed by SUNILSING SHIVAJI NIKAM
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b98ce938374a86717bb5977ddbce16908e9c51533d252564989be91f4b805764, serialNumber=f77d903492f7578562d032fa9f7e1fa812cb18daf3aee53af4aa4e8a0b74337e, cn=SUNILSING SHIVAJI NIKAM
Date: 2020.11.06 11:42:23 +05'30'

( सु. शि. निकम )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था वनामती, नागपूर ( ३ जादा प्रतींसह ),
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग ( व्यय-४/अर्थसंकल्प-३ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन क्रमांक २५ ) मंत्रालय मुंबई-३२.
११. निवड नस्ती कार्यासन सीपीटीपी-ब.